20110609103213001



# महाराष्ट्र शासन राजपत्र

# असाधारण भाग चार

वर्ष १, अंक ५] सोमवार, एप्रिल १३, २००९/चैत्र २३, शके १९३१ [पृष्ठे १८, किंमत : रुपये १८.००

**असाधारण क्रमांक १९**

**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम.**

**अनुक्रमणिका**



दिनांक ७ एप्रिल २००९ रोजी मा. राज्यपालांनी संमती दिलेला महाराष्ट्र विधानमंडळाचा पुढील अधिनियम माहितीसाठी, याद्वारे, प्रसिद्ध करण्यात येत आहे.

**ह. बा. पटेल,**
सचिव,
महाराष्ट्र शासन,
विधी व न्याय विभाग.

---

**सन २००९ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ११.**

(मा. राज्यपालांची संमती मिळाल्यानंतर **"महाराष्ट्र शासन राजपत्रात"** दिनांक १३ एप्रिल २००९ रोजी प्रथम प्रसिद्ध केलेला अधिनियम.)

**मुंबई महानगरपालिका अधिनियमात आणखी सुधारणा करण्यासाठी अधिनियम.**

१८८८चा मुंबई ३. **ज्याअर्थी,** यात यापुढे दिलेल्या प्रयोजनांसाठी, मुंबई महानगरपालिका अधिनियमात आणखी सुधारणा करणे इष्ट आहे ; **त्याअर्थी,** भारतीय गणराज्याच्या सत्तावन्नाव्या वर्षी, याद्वारे, पुढील अधिनियम करण्यात येत आहे :—

**१.** (१) या अधिनियमास, मुंबई महानगरपालिका (तिसरी सुधारणा) अधिनियम, २००६, असे म्हणावे. संक्षिप्त नाव व प्रारंभ.

(२) तो, राज्य शासन, **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे नेमून देईल अशा दिनांकास अंमलात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या प्रकरण आठ मधील मालमत्ता कर या शीर्षकाखालील उप शीर्षकाची सुधारणा.

२. मुंबई महानगरपालिका अधिनियम (यात यापुढे ज्याचा निर्देश " मुख्य अधिनियम " असा करण्यात आला आहे) याच्या प्रकरण आठमधील, " बसविण्याजोगे मालमत्ता कर " या उप शीर्षकाऐवजी पुढील उप शीर्षक दाखल करण्यात येईल :— १८८८ चा मुंबई ३.

" पट्टीयोग्य मूल्य किंवा भांडवली मूल्य यावर बसविण्याजोगे मालमत्ता कर. ".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ यामध्ये कलम १३९अ समाविष्ट करणे.

३. मुख्य अधिनियमाच्या प्रकरण आठ मध्ये, अशा प्रकारे दाखल करण्यात आलेल्या उप शीर्षकानंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

मालमत्ता करांत कोणत्या करांचा समावेश होतो.

" १३९ अ. (१) या अधिनियमान्वये बृहन्मुंबईतील इमारती व जमिनी यांवर बसवण्याजोग्या मालमत्ता करात, पाणीपट्टी, पाणी लाभ कर, मलनिस्सारण कर, मलनिस्सारण लाभ कर, सर्वसाधारण कर, शिक्षण उपकर, पथकर व सुधार आकार यांचा अंतर्भाव असेल.

(२) मालमत्ता कर बसविण्याच्या प्रयोजनासाठी, " इमारत " या शब्दप्रयोगामध्ये, सदनिका, गाळा, युनिट किंवा इमारतीचा कोणताही भाग यांचा अंतर्भाव होतो.

(३) सर्व किंवा कोणतेही मालमत्ता कर श्रेणीत प्रमाणावर लादता येतील.

(४) या अधिनियमात अन्यथा तरतूद केली असेल त्याव्यतिरिक्त, महानगरपालिका, कलम १४०अ अन्वये, इमारतींवर व जमिनींवर त्यांच्या भांडवली मूल्याच्या आधारे कोणतेही किंवा सर्व मालमत्ता कर बसविण्याच्या पद्धतीचा स्वीकार करेपर्यंत, अशा इमारतींच्या व जमिनींच्या पट्टीयोग्य मूल्यावर सर्व मालमत्ता कर बसविणे महानगरपालिकेने चालू ठेवणे हे कायदेशीर असेल. ".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १४० ची सुधारणा.

४. मुख्य अधिनियमाच्या कलम १४० मध्ये,–

(१) विद्यमान समासटीपेऐवजी, पुढील समासटीप दाखल करण्यात येईल :—

" पट्टीयोग्य मूल्यावर किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्यावर बसविण्याजोगे मालमत्ता कर व ते कोणत्या दरांनी बसविण्याजोगे असतील. " ;

(२) पोट-कलम (१) मध्ये,–

(क) " बृहन्मुंबईतील इमारती व जमिनी " या मजकुराने सुरू होणाऱ्या व " संबोधण्यात येईल " या मजकुराने संपणाऱ्या मजकुराऐवजी " बृहन्मुंबईतील इमारती व जमिनी यांवर पुढील मालमत्ता कर बसविण्याजोगे असतील " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ख) खंड (अ) चे उपखंड (एक) व (दोन) आणि खंड (ब) चे उपखंड (एक) व (दोन) यांमध्ये, " पट्टीयोग्य मूल्याच्या " हा मजकूर ज्या ज्या ठिकाणी आला असेल तेथे त्या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, त्यांच्या भांडवली मूल्याच्या " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(ग) खंड (क) मध्ये—

(एक) " त्यांच्या पट्टीयोग्य मूल्याच्या आठ टक्क्यांहून कमी नसेल आणि पन्नास टक्क्यांहून अधिक नसेल " हा मजकूर ज्या ठिकाणी आला असेल तेथे त्या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, त्यांच्या भांडवली मूल्याच्या ०.१ टक्क्यांहून कमी नसेल आणि १ टक्क्याहून अधिक नसेल " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(दोन) " त्यांच्या पट्टीयोग्य मूल्याच्या एक अष्टमांश टक्क्यांहून कमी नसेल आणि पाच टक्क्यांहून अधिक नसेल " हा मजकूर ज्या ठिकाणी आला असेल त्या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, त्यांच्या भांडवली मूल्याच्या ०.०१ टक्क्यांहून कमी नसेल आणि ०.२ टक्क्यांहून अधिक नसेल " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(घ) **स्पष्टीकरण** वगळण्यात येईल ;

(ङ) परंतुक वगळण्यात येईल.

५. मुख्य अधिनियमाच्या कलम १४० नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ यामध्ये कलम १४०अ समाविष्ट करणे.

भांडवली मूल्यावर बसवावयाचे मालमत्ता कर आणि त्यांचा दर.

" **१४०अ.** या अधिनियमांच्या कलम १४० मध्ये किंवा इतर कोणत्याही तरतुदींमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, महानगरपालिकेस कलम १२८ च्या तरतुदींनुसार निर्धारित करता येईल अशा दरांनी अशा दिनांकास आणि त्या दिनांकापासून इमारतींच्या व जमिनींच्या भांडवली मूल्यांच्या आधारे **बृहन्मुंबईतील** इमारतींवर व जमिनींवर मालमत्ता कर बसविण्याची पद्धत स्वीकारण्याचा ठराव महानगरपालिकेला संमत करता येईल :

परंतु, ज्या दिनांकास भांडवली मूल्यावर असा मालमत्ता कर बसविण्यात आला असेल अशा दिनांकास व त्या दिनांकापासून पाच वर्षांच्या कालावधीसाठी, असा कर,—

(एक) निवासी प्रयोजनांसाठी वापरण्यात येणाऱ्या इमारतींच्या बाबतीत, अशा दिनांकाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये त्यांच्याबाबतीत बसविण्यायोग्य असलेल्या मालमत्ता कराच्या रकमेच्या दुप्पट रकमेपेक्षा अधिक असणार नाही, आणि

(दोन) अनिवासी प्रयोजनांसाठी वापरण्यात येणाऱ्या इमारतींच्या किंवा जमिनींच्या बाबतीत, अशा दिनांकाच्या लगतपूर्वीच्या वर्षांमध्ये त्यांच्याबाबतीत बसविण्यायोग्य असलेल्या मालमत्ता कराच्या रकमेच्या तिप्पट रकमेपेक्षा अधिक असणार नाही :

परंतु, आणखी असे की, कलम १५४ च्या पोट-कलम (१क) अन्वये सुधारित केल्यानंतर निश्चित केलेल्या, कोणत्याही इमारतींच्या किंवा जमिनींच्या भांडवली मूल्याच्या आधारे बसवलेला मालमत्ता कर हा, काहीही झाले तरी, अशा सुधारणा केलेल्या वर्षाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये देय असलेल्या मालमत्ता कराच्या ४० टक्के इतक्या रकमेहून अधिक असणार नाही :

परंतु असेही की, कलम १४०अ अन्वये मालमत्ता कर बसविण्याकरिता आधारभूत म्हणून भांडवली मूल्याचा स्वीकार केल्याच्या वर्षापासून पाच वर्षांच्या कालावधीकरिता

४६.४५ चौ.मीटर (५०० चौ. फूट) किंवा त्याहून कमी चटई क्षेत्र असलेल्या निवासी इमारतींच्या किंवा निवासी गाळ्यांच्या बाबतीत बसविण्यायोग्य असलेली मालमत्ता कराची रक्कम ही अशा प्रकारे आधारभूत म्हणून भांडवली मूल्याचा स्वीकार केलेल्या वर्षाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये बसविलेल्या व देय असलेल्या मालमत्ता कराच्या रकमेपेक्षा अधिक असणार नाही.

**स्पष्टीकरण.—** या कलमाच्या प्रयोजनाकरिता, महापालिका जेव्हा इमारतीच्या भांडवली मूल्याच्या आधारे मालमत्ता कर बसविण्यास सुरुवात करील त्यानंतर अशा करपात्र इमारतींचे मालमत्ता कर प्रत्येक पाच वर्षांच्या कालावधीनंतर सुधारित करण्यात येईल आणि अशा प्रत्येक वेळी बसविण्यात येणारा मालमत्ता कर हा, अशा सुधारणा करण्यात येणाऱ्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये देय असलेल्या मालमत्ता कराच्या ४० टक्केहून अधिक असणार नाही. ".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १४४ ची सुधारणा.

**६.** मुख्य अधिनियमाच्या कलम १४४ मध्ये ,—

(१) पोट-कलम (२) नंतर, पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :—

" (२अ) महानगरपालिकेने इमारतींच्या व जमिनींच्या भांडवली मूल्यावर मालमत्ता कर बसविण्याची पद्धत स्वीकारली असेल तर, शासनाकडे निहित असलेल्या व किफायतशीररीत्या भोगवट्यात असलेल्या बृहन्मुंबईतील ज्या इमारतींच्या व जमिनींच्या संबंधात, उक्त माफी दिली गेली नसती तर, केंद्र सरकारकडून किंवा, यथास्थिति, राज्य शासनाकडून सर्वसाधारण कर बसविण्यात आला असता, त्याबाबतीत त्या इमारतींचे व जमिनींचे भांडवली मूल्य हे शासकीय अभिलेखामधील अशा जमिनींच्या किंवा इमारतींच्या पुस्तक मूल्याइतके असेल, आणि असे भांडवली मूल्य पाच वर्षांच्या मुदतीकरिता अंमलात राहील ; मात्र दरम्यान, शासनाकडे निहित असलेल्या बृहन्मुंबईतील इमारतींची व जमिनींची संख्या किंवा व्याप्ती यात मोठ्या प्रमाणात वाढ किंवा घट झाली तर त्या वाढीच्या किंवा घटीच्या प्रमाणातच अशा मूल्यात बदल होईल. " ;

(२) पोट-कलम (३) मध्ये,—

(क) " पट्टीयोग्य मूल्यावर " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्यावर " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(ख) " पोट-कलम (२) " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, पोट-कलम (२अ) " हा मजकूर जादा दाखल करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ यामध्ये कलम १४४अ ऐवजी नवीन कलम दाखल करणे.

**७.** मुख्य अधिनियमाच्या कलम १४४अ ऐवजी, पुढील कलम दाखल करण्यात येईल :—

मालमत्ता कर देण्याबाबत सवलत.

" **१४४अ.** या अधिनियमात काहीही अंतर्भूत असले तरी, ज्यामध्ये, महानगरपालिकेने किंवा राज्य शासनाने या कलमाच्या प्रयोजनासाठी नेमून दिलेली कोणतीही सामाजिकदृष्ट्या किंवा पारिस्थितीकीय लाभदायक योजना अंमलात आणण्यात येत आहे, अशा इमारतींच्या व जमिनींच्या संबंधात देय असलेल्या मालमत्ता कराच्या संबंधातील सवलत, महानगरपालिका निर्धारित करील अशा मालमत्ता कराच्या टक्केवारीच्या मर्यादेपर्यंत देता येईल. ".

८. मुख्य अधिनियमाच्या कलम १४४ब ऐवजी, पुढील कलम दाखल करण्यात येईल :—

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १४४ब ऐवजी नवीन कलम दाखल करणे.

विवक्षित इमारतींच्या संबंधात कमी केलेल्या दराने मालमत्ता कर बसविण्यासाठी तात्पुरत्या तरतुदी.

"**१४४ब.** कलम १४० किंवा १४०अ मध्ये अथवा या अधिनियमाच्या इतर कोणत्याही तरतुदींमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, मुंबई महानगरपालिका आणि महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना (सुधारणा) अधिनियम, १९९५ याच्या प्रारंभाचा दिनांक किंवा निवासी प्रयोजनाकरिता वापरण्यात येणाऱ्या जागेचा प्रथमच भोगवटा केल्याचा दिनांक यांपैकी जो नंतरचा असेल त्या दिनांकापासून वीस वर्षांच्या कालावधीमध्ये, राज्य शासन, **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे, वेळोवेळी निश्चित करील अशा कमी केलेल्या दरांनी इमारतींवर मालमत्ता कर बसविण्यात येईल आणि निरनिराळ्या कालावधीसाठी व इमारतींच्या निरनिराळ्या वर्गांसाठी निरनिराळे कमी केलेले दर निश्चित करता येतील, मग अशा इमारती अशा प्रारंभापूर्वी किंवा प्रारंभानंतर बांधलेल्या असोत, अशा इमारती पुढीलप्रमाणे असतील :—

१९९६ चा महा. ५.

(अ) महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाकडून किंवा महाराष्ट्र झोपडपट्टी (सुधारणा, निर्मूलन व पुनर्विकास) अधिनियम, १९७१ अन्वये घोषित करण्यात आलेल्या झोपडपट्टी पुनर्वसन योजनेखाली आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांकरिता आणि कमी उत्पन्न गटासाठी कमी खर्चात घरे बांधण्याच्या योजनेखाली बांधण्यात आलेल्या इमारती, किंवा

१९७१ चा महा. २८.

(ब) बांधण्यात आलेल्या ज्या इमारतींमध्ये सार्वजनिक गृहनिर्माण (PH) किंवा दाट लोकवस्ती गृहनिर्माण (HDH), बेघरांसाठी गृहनिर्माण (HD) यांसाठी असलेल्या विकास योजनेमध्ये नियतवाटप केलेल्या, नेमून दिलेल्या किंवा राखून ठेवलेल्या भूखंडावर प्रकल्पबाधित व्यक्तींकरिता बांधण्यात आलेल्या गाळ्यांचा भाग आहे आणि ज्या भूखंडांचा महानगरपालिकेने किंवा सार्वजनिक प्राधिकरणाने किंवा मालकाने विकास किंवा पुनर्विकास केला असून ज्यांच्या बाबतीत, बेघरांसाठी गृहनिर्माण योजनेअन्वये किंवा सार्वजनिक गृहनिर्माण वा दाट लोकवस्ती गृहनिर्माण योजनेअन्वये, मालकाने, प्रकल्पबाधित व्यक्तींसाठी नियतवाटप करण्याकरिता किंवा त्या भूखंडावरील विद्यमान भाडेकरूंचे पुनर्वसन करण्याकरिता किंवा अशा व्यक्ती किंवा भाडेकरू या दोघांचे पुनर्वसन करण्याकरिता आणि महानगरपालिकेने हाती घेतलेल्या प्रकल्पांमुळे बाधित झालेल्या व्यक्तींचे पुनर्वसन करण्याकरिता बांधिव क्षेत्रापैकी किमान पन्नास टक्के किंवा, यथास्थिति दहा टक्के बांधिव क्षेत्र महानगरपालिकेकडे मोफत सुपूर्द करणे आवश्यक आहे अशा इमारती ; किंवा

(क) आगीने नष्ट झालेली किंवा कोसळलेली अथवा पाडलेली आणि पुनर्बांधकाम केलेली इमारत ; किंवा

(ड) महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (MHADA) ; किंवा महानगरपालिका यांनी हाती घेतलेल्या नगर नवीकरण योजनेखाली बांधण्यात आलेल्या उपकरप्राप्त इमारती ; किंवा

(ई) जेथे झोपडपट्टीवासीयांचे पुनर्वसन करण्याकरिता असलेल्या गाळ्यांचा भाग (हिस्सा) आहे अशा, सार्वजनिक प्राधिकरणाच्या मालकीच्या जमिनींवर पुनर्वसन प्रकल्पान्वये बांधण्यात आलेल्या इमारती :

परंतु, यात नमूद केलेल्या कोणत्याही योजनेअन्वये बांधण्यात आलेली कोणतीही इमारत किंवा तिचा भाग यांचा वापर संबंधित प्रकल्पबाधित व्यक्ती किंवा झोपडपट्टीवासी यांच्या पुनर्वसनासाठी, निवासी प्रयोजनाकरिता करण्यात येत नसेल आणि अशी जी इमारत किंवा जो भाग विक्रीसाठी उपलब्ध असेल किंवा वाणिज्यिक प्रयोजनासाठी ज्याचा वापर करण्यात येत असेल अशा कोणत्याही इमारतीच्या किंवा तिच्या भागाच्या संबंधात, कराच्या अशा कमी केलेल्या दराची सवलत उपलब्ध असणार नाही. ".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १४६ ची सुधारणा.

९. मुख्य अधिनियमाच्या कलम १४६ मधील, पोट-कलम (२) मध्ये,—

(१) खंड (ब) मधील " आणि " हा शब्द वगळण्यात येईल ;

(२) खंड (क) नंतर, पुढील खंड जादा दाखल करण्यात येतील :—

" (ड) जी मालक नाही अशा व्यक्तीने परिवास्तू धारण केली असेल किंवा ती तिचा भोगवटा करीत असेल आणि परिवास्तूच्या मालकाचा ठावठिकाणा निश्चित माहीत नसेल तर अशा धारकाकडून किंवा भोगवटादाराकडून ; आणि

(ई) विकासकाने किंवा मुखत्याराने अथवा कोणत्याही व्यक्तीने परिवास्तू धारण केली असेल किंवा तिचा विकास केला असेल मग-अशा व्यक्तीने कोणत्याही नात्याने ती परिवास्तू धारण केलेली असेल आणि त्यांपैकी प्रत्येकाला त्या परिवास्तूची विक्री करण्याचा अधिकार असेल-किंवा तिने तो संपादित केला असेल तर अशा धारकाकडून, विकासकाकडून, मुखत्याराकडून किंवा, यथास्थिति, त्या व्यक्तीकडून :

परंतु, असा धारक, विकासक, मुखत्यार किंवा व्यक्ती प्रत्यक्ष विक्री होईपर्यंतच असा कर वसूल केला जाण्यास पात्र असेल. ".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १४७ ची सुधारणा.

१०. मुख्य अधिनियमाच्या कलम १४७ मध्ये,—

(१) पोट-कलम (१) मध्ये " पट्टीयोग्य मूल्य " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याच्या आधारे बसविण्यात आलेल्या मालमत्ता कराची रक्कम " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) मध्ये " पट्टीयोग्य मूल्य " हा मजकूर ज्या दोन ठिकाणी आला आहे त्या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याच्या आधारे बसविण्यात आलेल्या मालमत्ता कराची रक्कम " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १४८ ची सुधारणा.

११. मुख्य अधिनियमाच्या कलम १४८ मध्ये " पट्टीयोग्य मूल्य " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याच्या आधारे बसविण्यात आलेल्या मालमत्ता कराची रक्कम " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १५० ची सुधारणा.

१२. मुख्य अधिनियमाच्या कलम १५० मध्ये,—

(१) पोट-कलम (१) मध्ये " आणि " या मजकुराने सुरू होणाऱ्या आणि " नमूद केलेला असेल " या मजकुराने संपणाऱ्या मजकुराऐवजी, पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :–

" आणि ती सोबत, आयुक्त, स्थायी समितीच्या मान्यतेने वेळोवेळी विहित करील अशी फी जोडलेली असेल आणि त्या नोटिशीमध्ये उक्त नमुन्याप्रमाणे आवश्यक असलेला सर्व तपशील स्पष्टपणे व बिनचूक नमूद केलेला असेल " ;

(२) पोट-कलम (२) नंतर, पुढील पोट-कलम जादा दाखल करण्यात येईल :—

" (३) हस्तांतरित करावयाच्या मालमत्तेच्या संबंधात देय असलेला मालमत्ता कर, अशी नोटीस देण्यापूर्वी पूर्णपणे भरण्यात आला नसेल तर, महानगरपालिका, मालमत्ता कर देण्यास प्रथमत: पात्र असलेल्या कोणत्याही व्यक्तीच्या हक्काच्या हस्तांतरणाची नोंद निर्धारण पुस्तकामध्ये घेणार नाही. ".

**१३.** मुख्य अधिनियमाच्या कलम १५२ मध्ये,— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १५२ ची सुधारणा.

(१) पोट-कलम (१) मध्ये " किंवा रिकाम्या असलेल्या कोणत्याही इमारतीचा पुन्हा भोगवटा करण्यात येईल तेव्हा " या मजकुराऐवजी, " किंवा तिचा भोगवटा करण्यात येईल अथवा पुन्हा भोगवटा करण्यात येईल किंवा त्या संपूर्ण इमारतीच्या किंवा तिच्या भागाच्या वापरकर्त्यामध्ये बदल करण्यात येईल तेव्हा " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) मध्ये, " तारखेपासून जी इमारत " या मजकूराने सुरू होणाऱ्या आणि " मोजण्यात येईल. " या मजकुराने संपणाऱ्या मजकुराऐवजी, पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :-

" किंवा पुन्हा भोगवटा केल्याच्या किंवा, यथास्थिति, त्या संपूर्ण इमारतीच्या किंवा तिच्या भागाच्या वापरकर्त्यामध्ये बदल झाल्याच्या तारखेपासून मोजण्यात येईल " .

**१४.** मुख्य अधिनियमाच्या कलम १५२ नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ यामध्ये कलम १५२अ समाविष्ट करणे.

" **१५२अ.** (१) जो कोणी,— अवैध इमारतीवर शास्ती बसविणे.

(अ) या अधिनियमान्वये किंवा त्या त्या वेळी अंमलात असलेल्या इतर कोणत्याही कायद्यान्वये परवानगी न घेता किंवा अशा परवानगीसोबत असलेल्या कोणत्याही शर्तीचे उल्लंघन करून आपल्या जमिनीवर ;

(ब) प्रादेशिक नियोजन व नगररचनेशी संबंधित कायद्यान्वये मान्यता न घेता तयार केलेल्या आपल्या मालकीच्या जागेवर ;

(क) या अधिनियमाची कोणतीही तरतूद किंवा त्याखाली केलेले कोणतेही नियम किंवा उपविधी किंवा हा अधिनियम किंवा असा नियम किंवा उपविधी यांअन्वये वैधरीत्या दिलेला कोणताही निदेश किंवा केलेली मागणी यांचा भंग करून आपल्या जमिनीवर ; किंवा

(ड) या अधिनियमाच्या कोणत्याही तरतुदीचे किंवा त्या त्या काळी अंमलात असलेल्या कोणत्याही कायद्याचा आणि त्याखाली केलेले नियम किंवा उपविधी यांचा भंग करून महानगरपालिका अथवा केंद्र किंवा राज्य शासन, अथवा अशा कोणत्याही शासनाने स्थापन केलेले कोणतेही वैधानिक महामंडळ किंवा संघटना किंवा कंपनी यांच्या मालकीच्या किंवा त्यांनी भाडेपट्ट्याने दिलेल्या कोणत्याही जमिनीवर,

कोणत्याही इमारतीचे किंवा इमारतीच्या भागाचे अवैधरीत्या बांधकाम करील किंवा पुनर्बांधकाम करील, तो, अशा अवैध बांधकामाच्या बाबतीत, त्याच्याविरुद्ध दाखल करता येईल अशा कोणत्याही

कार्यवाहीस बाध न आणता, ते बांधकाम जोपर्यंत अवैध बांधकाम म्हणून राहील तोपर्यंत दरवर्षी अशा इमारतीवर बसवण्यायोग्य असलेल्या मालमत्ता कराच्या दुपटीइतकी शास्ती भरण्यास पात्र असेल :

परंतु, असा कर व शास्ती बसविणे व ती गोळा करणे, यांचा, असे अवैध बांधकाम किंवा पुनर्बांधकाम, ते अस्तित्वात असेतोपर्यंतच्या कोणत्याही कालावधीसाठी ते अवैध बांधकाम किंवा पुनर्बांधकाम विनियमित झाले आहे असा अन्वयार्थ लावला जाणार नाही मग असा कालावधी कितीही असो.

(२) पोट-कलम (१) अन्वये देय असलेली शास्ती, ही जणू काही अशी शास्तीची रक्कम ही या अधिनियमाच्या अशा व्यक्तींकडून देय असलेली मालमत्ता कराची रक्कम असल्याप्रमाणे निर्धारित करण्यात व गोळा करण्यात येईल.'' .

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १५४ ची सुधारणा.

१५. मुख्य अधिनियमाच्या कलम १५४ मध्ये,—

(१) समासटीपेमध्ये '' पट्टीयोग्य मूल्य '' या मजकुरानंतर, '' किंवा भांडवली मूल्य '' हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (१) नंतर, पुढील पोट-कलमे समाविष्ट करण्यात येतील :—

'' (१अ) मालमत्ता कर आकारणीयोग्य असलेल्या कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनिचे भांडवली मूल्य निश्चित करण्यासाठी, आयुक्त, मुंबई मुद्रांक अधिनियम, १९५८ च्या तरतुदींन्वये तयार केलेले मुंबई मुद्रांक (संपत्तीचे वास्तविक बाजार मूल्य ठरवणे) नियम, १९९५ अन्वये, तयार केलेल्या व त्या त्या वेळी अंमलात असलेल्या मुद्रांक शुल्क सिध्द गणकामध्ये दर्शवलेले कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे मूल्य लक्षात घेईल अथवा जिचे भांडवली मूल्य निर्धारित करणे आवश्यक आहे अशी इमारत किंवा जमीन ज्या क्षेत्रातील असेल अशा कोणत्याही विशिष्ट क्षेत्रातील मालमत्तांचे मूल्य मुद्रांक शुल्क सिध्द गणकामध्ये दाखविण्यात आले नसेल तर त्याबाबतीत आयुक्तास, अशा इमारतीचे किंवा जमिनीचे बाजार मूल्य आधारभूत मूल्य म्हणून, विचारात घेऊन, तसेच पुढील घटक देखील विचारात घेऊन तिचे भांडवली मूल्य निश्चित करता येईल :--

१९५८ चा मुंबई ६०.

(अ) जमिनीचे स्वरूप व प्रकार आणि इमारतीची संरचना,

(ब) जमिनीचे क्षेत्र किंवा इमारतीचे चटई क्षेत्र,

(क) वापरकर्ता प्रवर्ग म्हणजे (एक) निवासी, (दोन) वाणिज्यिक (दुकाने, [मॉल] किंवा तत्सम), (तीन) कार्यालये, (चार) हॉटेल (चार तारांकितपर्यंत), (पाच) हॉटेल (चार तारांकितपेक्षा अधिक), (सहा) बँका, (सात) उद्योग व कारखाने, (आठ) शालेय व महाविद्यालयीन इमारत किंवा शैक्षणिक प्रयोजनांसाठी वापरण्यात येणारी इमारत, (नऊ) मॉल, आणि (दहा) वरीलपैकी कोणत्याही प्रवर्गांमध्ये समाविष्ट नसलेली अन्य कोणतीही इमारत किंवा जमीन,

(ड) इमारत किती वर्ष जुनी आहे, किंवा

(ई) पोट-कलम (१ब) अन्वये केलेल्या नियमांद्वारे विहित करण्यात येतील असे अन्य काही घटक.

(१ब) आयुक्त, पोट-कलम (१अ) अन्वये भांडवली मूल्य निश्चित करण्याच्या प्रयोजनाकरिता स्थायी समितीच्या मान्यतेने, इमारतींच्या किंवा जमिनींच्या प्रवर्गाच्या तपशिलांच्या बाबतीत आणि अशा विविध प्रवर्गांना द्यावयाच्या बहुविध भारांकाच्या बाबतीत (weightage by multiplication), नियम तयार करील.

(१क) कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे पोट-कलम (१अ) अन्वये निश्चित केलेले भांडवली मूल्य दर पाच वर्षांनी सुधारित करता येईल :

परंतु, आयुक्तास, कारणे लेखी नमूद करून, उक्त पाच वर्षांच्या कालावधीत, कोणत्याही वेळी, कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनींचे भांडवली मूल्य सुधारित करता येईल आणि तदनुसार, तो, कलम १६७ अन्वये, अशा इमारतींच्या किंवा जमिनींच्या संबंधात, निर्धारण पुस्तकात सुधारणा करील. " ;

(३) पोट-कलम (२) मध्ये, " पट्टीयोग्य मूल्यात " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्यात " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(४) पोट-कलम (३) वगळण्यात येईल.

**१६.** मुख्य अधिनियमाच्या कलम १५५ मधील, पोट-कलम (१) मध्ये,— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १५५ ची सुधारणा.

(क) " पट्टीयोग्य मूल्य " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(ख) खंड (ब) ऐवजी, पुढील खंड दाखल करण्यात येईल :—

" (ब) अशा इमारतीच्या किंवा जमिनीच्या अथवा तिच्या कोणत्याही भागाच्या संबंधात, कलम १५४ च्या, पोट-कलम (१अ) च्या खंड (अ) ते (ई) मध्ये नमूद केलेल्या सर्व किंवा कोणत्याही बाबींसंबंधातील तपशील. ".

**१७.** मुख्य अधिनियमाच्या कलम १५६ मध्ये,— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १५६ ची सुधारणा.

(१) " आयुक्त " या मजकुराने सुरू होणाऱ्या आणि " नोंद करील " या मजकुराने संपणाऱ्या मजकुराऐवजी, पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

" आयुक्त, स्थायी समितीच्या मान्यतेने नियमांद्वारे त्यास विहित करता येईल अशा नमुन्यात व अशा रीतीने एक पुस्तक ठेवील आणि अशा पुस्तकाला " निर्धारण पुस्तक " असे संबोधण्यात येईल आणि त्यात प्रत्येक सरकारी वर्षी पुढील गोष्टींची नोंद करील, " ;

(२) खंड (ब) मध्ये " पट्टीयोग्य मूल्य " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(३) खंड (ड) ऐवजी, पुढील खंड दाखल करण्यात येईल :—

" (ड) जर अशी कोणतीही इमारत किंवा जमीन तिच्यावर सर्वसाधारण कर निर्धारित केला जाण्यास पात्र नसेल तर किंवा तिला मालमत्ता कराच्या रकमेतून पूर्णपणे किंवा यथास्थिति, अंशत: सूट दिली असेल तर, अशा अपात्रतेचे किंवा, यथास्थिति, सूट देण्याचे कारण ; " ;

(४) खंड (ई) मध्ये, " पट्टीयोग्य मूल्याच्या " या मजकुरानंतर " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याच्या " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १५७ ची सुधारणा.

**१८.** मुख्य अधिनियमाच्या कलम १५७ मधील, पोट-कलम (१) मध्ये "कलम २४ च्या तरतुदींखाली" या मजकुराऐवजी "प्रशासकीय प्रयोजनांसाठी" हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १६० ची सुधारणा.

**१९.** मुख्य अधिनियमाच्या कलम १६० मधील, पोट-कलम (२) मध्ये, "घोषणाफलक लावून" या मजकुरानंतर "किंवा आयुक्तास योग्य वाटेल अशा इलेक्ट्रॉनिक माध्यमासह इतर कोणत्याही पद्धतीने" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १६२ ची सुधारणा.

**२०.** मुख्य अधिनियमाच्या कलम १६२ मधील,—

(१) पोट-कलम (१) मध्ये,—

(क) "पंधरा दिवसांच्या" या मजकुराऐवजी "एकवीस दिवसांच्या" हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ख) "पट्टीयोग्य मूल्याविरुद्ध" या मजकुरानंतर "किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याविरुद्ध" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) मध्ये,—

(क) "पट्टीयोग्य मूल्य" या मजकुराऐवजी "पट्टीयोग्य मूल्य किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य" हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ख) "पंधरा दिवसांच्या" या मजकुराऐवजी "एकवीस दिवसांच्या" हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १६३ ची सुधारणा.

**२१.** मुख्य अधिनियमाच्या कलम १६३ मधील, पोट-कलम (१) मध्ये, "पट्टीयोग्य मूल्याच्या" या मजकुरानंतर "किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याच्या" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १६६ ची सुधारणा.

**२२.** मुख्य अधिनियमाच्या कलम १६६ मधील, पोट-कलम (१) मध्ये, "पट्टीयोग्य मूल्यांना" या मजकुरानंतर "किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्यांना" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १६७ ची सुधारणा.

**२३.** मुख्य अधिनियमाच्या कलम १६७ मधील, पोट-कलम (१) मध्ये, "पट्टीयोग्य मूल्यांत" या मजकुरानंतर "किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्यांत" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १६९ ची सुधारणा.

**२४.** मुख्य अधिनियमाच्या कलम १६९ मधील, पोट-कलम (१) मधील, खंड (एक) मध्ये, "पट्टीयोग्य मूल्याच्या" या मजकुरानंतर "किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याच्या" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

२५. मुख्य अधिनियमाच्या कलम १७० मधील, पोट-कलम (१) मधील, खंड (एक) मध्ये, " पट्टीयोग्य मूल्याच्या " मजकुरानंतर " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याच्या " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १७० ची सुधारणा.

२६. मुख्य अधिनियमाच्या कलम १७२ मध्ये, " कलमे १६९ ते १७१ (सर्वांचा समावेश करून) " या मजकुराऐवजी " कलमे १६९ व १७० (दोन्ही धरून) " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १७२ ची सुधारणा.

२७. मुख्य अधिनियमाच्या कलम १७३ ब नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :--

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ मध्ये कलम १७३बअ समाविष्ट करणे.

" १७३ बअ. कलम १४०अ अन्वये मालमत्ता कर बसविण्यासाठी, भांडवली मूल्याचा आधारमूल्य म्हणून स्वीकार केल्याच्या दिनांकास व त्या दिनांकापासून, कलम १७३ब च्या तरतुदी अंमलात असण्याचे बंद होईल. ".

कलम १७३ ब अंमलात न राहणे.

२८. मुख्य अधिनियमाच्या कलम १७९ मध्ये, " अर्जदारास कलम २०० खाली दिलेले बिल अर्जासोबत पाठविले नसेल तर " या मजकुराऐवजी, " अर्जदारास कलम २०० खाली दिलेल्या बिलाची रक्कम चुकती केल्याची मूळ पावती किंवा त्यासंबंधीचा कोणताही वैध पुरावा अर्जासोबत जोडला नसेल तर " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १७९ ची सुधारणा.

२९. मुख्य अधिनियमाच्या कलम १९१ ई मधील, पोट-कलम (३) मध्ये, " अनुसूची ग १ " या मजकुराऐवजी " अनुसूची ग " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १९१ ई ची सुधारणा.

३०. मुख्य अधिनियमाच्या कलम १९५ ई मधील, पोट-कलम (१) मध्ये,—

(१) " जादा कर " या मजकुराने सुरू होणाऱ्या आणि " प्रमाणात बसवता येईल " या मजकुराने संपणाऱ्या मजकुराऐवजी, पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

" किंवा, यथास्थिति, महानगरपालिका निर्धारित करील अशा त्यांच्या भांडवली मूल्याच्या टक्केवारीच्या दराने जादा कर (ज्याचा यापुढे " शिक्षण उपकर " असा उल्लेख केला आहे) बसविता येईल " ;

(२) परंतुकामधील, खंड (क) मध्ये, " पट्टीयोग्य मूल्य " या मजकुरानंतर " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १९५ ई ची सुधारणा.

३१. मुख्य अधिनियमाच्या कलम १९५ फ मधील, पोट-कलम (२) मध्ये,—

(१) " पट्टीयोग्य मूल्यावर " या मजकुरानंतर " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्यावर " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) " पोट-कलम (२) " या मजकुरानंतर " किंवा पोट-कलम (२अ) " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १९५ फ ची सुधारणा.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १९५ ग ची सुधारणा.

**३२.** मुख्य अधिनियमाच्या कलम १९५ग मधील, पोट-कलम (१) मध्ये,—

(१) " अधिक नसलेल्या दराने " या मजकुरानंतर " किंवा, यथास्थिति, त्याच्या भांडवली मूल्याच्या टक्केवारीच्या दराने " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) परंतुकामधील, खंड (क) मध्ये, " पट्टीयोग्य मूल्य " या मजकुरानंतर " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १९७ ची सुधारणा.

**३३.** मुख्य अधिनियमाच्या कलम १९७ मध्ये, " मालमत्ता करांपैकी " या मजकुरापूर्वी " कलम २०० खाली दिलेल्या बिलामध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे, " हा मजकूर जादा दाखल करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २०१ ची सुधारणा.

**३४.** मुख्य अधिनियमाच्या कलम २०१ मधील, पोट-कलम (१) मध्ये " तीन " हा शब्द वगळण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ यामध्ये कलम २०२ ऐवजी नवीन कलम दाखल करणे.

**३५.** मुख्य अधिनियमाच्या कलम २०२ ऐवजी पुढील कलम दाखल करण्यात येईल :—

बिलाच्या न दिलेल्या रकमेवर.

" **२०२.** उपरोक्तप्रमाणे दिलेले असेल अशा बिलामध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे पहिल्या सहामाही कराची रक्कम, बिल दिल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत भरावयाची असेल आणि बिलामध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे दुसऱ्या सहामाही कराची रक्कम, प्रत्येक वर्षाच्या ३१ डिसेंबरपूर्वी भरावयाची असेल; आणि जर, कराची रक्कम भरण्यास पात्र असलेल्या व्यक्तीने उपरोक्तप्रमाणे आवश्यक असल्याप्रमाणे कराची रक्कम भरली नाही तर, अशी अदत्त कराची रक्कम किंवा त्या रकमेचा भाग यांव्यतिरिक्त, त्याने ज्या दिनांकापर्यंत असा कर भरावयाचा होता, त्या शेवटच्या दिनांकानंतर प्रत्येक महिन्यासाठी किंवा त्याच्या भागासाठी अशा कराच्या दोन टक्के इतकी रक्कम, शास्ती म्हणून भरण्यास तो जबाबदार असेल आणि बिलाची पूर्ण रक्कम देईपर्यंत अशी शास्ती भरण्यास तो जबाबदार असण्याचे चालू राहील :

परंतु, मुंबई महानगरपालिका (तिसरी सुधारणा) अधिनियम, २००६ याच्या प्रारंभाच्या दिनांकापूर्वी, २००९ चा
या अधिनियमान्वये ज्यासाठी बिल देण्यात आले आहे, असा कोणताही मालमत्ता कर पूर्णपणे किंवा महा.
अंशतः अदत्त राहिला असेल आणि कलम २०७अ अन्वये त्यावर कोणतीही शास्ती बसवलेली नसेल, ११.
त्याबाबतीत, ज्या व्यक्तीने असा कर भरलेला नाही ती व्यक्ती, ज्या दिनांकास व ज्या दिनांकापासून शास्ती बसविली जाऊ शकत होती परंतु ती बसविण्यात आलेली नाही, अशा दिनांकास व दिनांकापासून, या कलमाअन्वये तरतूद केल्याप्रमाणे, शास्ती भरण्यास जबाबदार असेल .".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २०३ ची सुधारणा.

३६. मुख्य अधिनियमाच्या कलम २०३ मध्ये,—

(१) पोट-कलम (१) मध्ये,—

(क) "उक्त कर" या मजकुराने सुरू होणाऱ्या, आणि "पुरेसे कारण दाखवले नाही" या मजकुराने संपणाऱ्या मजकुराऐवजी, पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

"जो कर भरण्यासाठी जिला बिल देण्यात आले आहे आणि जिच्यावर या अधिनियमाच्या तरतुदींअन्वये आवश्यक असल्याप्रमाणे शास्ती किंवा व्याज अथवा या दोन्हींसह कर भरण्याचे दायित्व आहे, अशा व्यक्तीने असा कर व त्यासोबत अशी शास्ती किंवा व्याज किंवा दोन्ही भरली नाही" ;

(ख) "किंवा कर कोणत्याही वाहनाच्या" या मजकुराने सुरू होणारा व "विकून वसूल करता येईल" या मजकुराने संपणारा मजकूर वगळण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) ऐवजी, पुढील पोट-कलम दाखल करण्यात येईल :—

"(२) ज्या व्यक्तीवर, तिला देण्यात आलेल्या बिलानुसार कर भरण्याचे दायित्व असेल अशा व्यक्तीने, या अधिनियमाच्या तरतुदींअन्वये आवश्यक असल्याप्रमाणे, कर भरला असेल परंतु कराच्या न भरलेल्या रकमेवर देय असेल त्याप्रमाणे, शास्तीची किंवा व्याजाची अथवा दोन्ही रकमा संपूर्णपणे किंवा अंशतः भरल्या नाहीत तर, अशा अदत्त रकमेबद्दल, जणू अशी रक्कम कराबद्दल देय असल्याप्रमाणे व त्याच रितीने, आयुक्त, अनुसूची "जे" च्या नमुन्यात, अधिपत्र योग्य त्या फेरफारांसह काढू शकेल." ;

(३) पोट-कलम (३) मध्ये,—

(क) "कराची येणे रक्कम, वसुलीच्या सर्व व्ययासह" या मजकुराऐवजी, "कराची, तसेच शास्तीची किंवा व्याजाची अथवा दोन्हींची, व वसुलीच्या सर्व व्ययासह एकत्र भरावयाची असलेली येणे रक्कम, कोणतीही असल्यास," हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ख) "१५ दिवसांच्या आत" या मजकुराऐवजी, "२१ दिवसांच्या आत" हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(४) पोट-कलम (४) ऐवजी, पुढील पोट-कलम दाखल करण्यात येईल :—

"(४) असा आदेश मालमत्तेच्या कोणत्याही ठळक भागी व महानगरपालिका कार्यालयाच्या कोणत्याही ठळक भागी लावून, तसेच उक्त मालमत्ता ही राज्य शासनाला महसूल देणारी जमीन असेल तेव्हा, जिल्हाधिकाऱ्याच्या कार्यालयात लावून उद्घोषित केला जाईल.".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २०५ ची सुधारणा.

**३७.** मुख्य अधिनियमाच्या कलम २०५ मध्ये, " आणि वाहने किंवा जनावरे " हा मजकूर वगळण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २०६ ची सुधारणा.

**३८.** मुख्य अधिनियमाच्या कलम २०६ मध्ये, पोट-कलम (२) मधील, " लिलावाने " या मजकुरानंतर, " किंवा मोहोरबंद बोली मागवून लिलावाने " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याचे कलम २०७ अ वगळणे.

**३९.** मुख्य अधिनियमाचे कलम २०७अ वगळण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २०८ ची सुधारणा.

**४०.** मुख्य अधिनियमाच्या कलम २०८ मध्ये, " निकटपूर्ववर्ती " या मजकुराने सुरू होणाऱ्या आणि " द्यावयाची शास्ती याच्या " या मजकुराने संपणाऱ्या मजकुराऐवजी, पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

" कलम २०२ अन्वये द्यावयाची कोणतीही शास्ती किंवा कलम २०७ अन्वये आकारता येण्याजोगी कोणतीही फी किंवा मुंबई महानगरपालिका (तिसरी सुधारणा) अधिनियम, २००६ च्या प्रारंभापूर्वी अस्तित्वात असलेल्या कलम २०७अ अन्वये द्यावयाची शास्ती, यांच्या ". २००९ चा महा.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २०९ ची सुधारणा.

**४१.** मुख्य अधिनियमाच्या कलम २०९ मध्ये,—

(१) पोट-कलम (१) नंतर, पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :—

" (१अ) पोट-कलम (१) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, कलम १४०अ अन्वये मालमत्ता कर बसविण्याकरिता, भांडवली मूल्य आधार—मूल्य म्हणून स्वीकृत केल्याच्या दिनांकास किंवा दिनांकापासून, परंतु या अधिनियमाच्या इतर तरतुदींस अधीन राहून, आयुक्तास, उक्त परिवास्तूच्या अशा भोगवटादारावर मालमत्ता कराच्या रकमेकरिता बिल बजावता येईल किंवा अशा परिवास्तूचे दोन किंवा अधिक भोगवटादार असतील तर, त्यापैकी प्रत्येकावर भांडवली मूल्यावर आधारित कराच्या संपूर्ण रकमेसाठी देय असलेल्या रकमेच्या भागाकरिता, उक्त परिवास्तूच्या संबंधात भांडवली मूल्यावर आधारित कराच्या एकूण रकमेशी, एक किंवा अनेक भोगवटादारांच्या परिवास्तूच्या अशा भागासाठी असलेल्या भांडवली मूल्याच्या, त्याच प्रमाणात देय असलेल्या रकमेकरिता बिल बजावता येईल." ;

(२) पोट-कलम (२) मधील " पंधरा दिवसांच्या आत " या मजकुराऐवजी, " तीस दिवसांच्या आत " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(३) पोट-कलम (३) मध्ये " एका वर्षापेक्षा अधिक कालावधीपासून येणे राहिली असेल, किंवा " हा मजकूर वगळण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २०९अ ची सुधारणा.

**४२.** मुख्य अधिनियमाच्या कलम २०९अ मध्ये,—

(१) पोट-कलम (१) मध्ये,—

(क) " ज्या भाड्याच्या रकमेचा अंदाज करण्यात आला असेल त्या रकमेचे " या मजकुरानंतर " किंवा, यथास्थिति, निश्चित केलेल्या भांडवली मूल्यावर आधारित कराच्या रकमेचे " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(ख) "अंदाजलेल्या एकूण भाड्याच्या रकमेशी" या मजकुरानंतर, "किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्यावर आधारित कराच्या रकमेशी" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) मध्ये "पंधरा दिवसांच्या आत" या मजकुराऐवजी, "तीस दिवसांच्या आत" हा मजकूर दाखल करण्यात येईल.

**४३.** मुख्य अधिनियमाच्या कलम २०९ब मध्ये,— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २०९ब ची सुधारणा.

(१) पोट-कलम (१) मध्ये, "पट्टीयोग्य मूल्याच्या" या मजकुरानंतर, "किंवा यथास्थिति, भांडवली मूल्याच्या" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) मध्ये "पंधरा दिवसांच्या आत" या मजकुराऐवजी, "तीस दिवसांच्या आत" हा मजकूर दाखल करण्यात येईल.

**४४.** मुख्य अधिनियमाच्या कलम २१० मध्ये, पोट-कलम (२) मधील, "मात्र कसूरदारावर मागणीची कोणतीही नोटीस बजावण्याची आवश्यकता असणार नाही" हा मजकूर वगळण्यात येईल. सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २१० ची सुधारणा.

**४५.** मुख्य अधिनियमाच्या कलम २१६ नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ यामध्ये कलम २१६अ समाविष्ट करणे.

"**२१६ अ.** या अधिनियमाअन्वये कराची रक्कम किंवा अन्य कोणत्याही देय रकमा भरण्यास पात्र असणाऱ्या कोणत्याही व्यक्तीस, महानगरपालिकेने तिच्या अधिकार क्षेत्रात प्रसृत होणाऱ्या दोन अग्रगण्य वर्तमानपत्रांमध्ये जाहीर नोटीस देऊन त्याबाबतीत विनिर्दिष्ट केलेल्या कोणत्याही बँकेत किंवा कोणत्याही अभिकरणाकडे त्या रकमेचा भरणा करण्याच्या सुविधेचा उपयोग करून घेता येईल ; आणि स्वत:ला अशा सुविधेचा उपयोग करून घेणारी व्यक्ती, आयुक्त निर्धारित करील त्याप्रमाणे, अशा बँकेकडे किंवा, यथास्थिति, अभिकरणाकडे त्या संबंधातील अशी फी भरण्यास पात्र असेल.". मालमत्ता कराची रक्कम भरण्याच्या सुविधेसाठी विशेष तरतूद.

**४६.** मुख्य अधिनियमाच्या कलम २१७ मध्ये,— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २१७ ची सुधारणा.

(१) पोट-कलम (१) मधील, "पट्टीयोग्य मूल्याविरुद्ध" या मजकुरानंतर, "किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याविरुद्ध" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) मध्ये,—

(क) खंड (अ) मध्ये, "पंधरा दिवसांच्या आत" या मजकुराऐवजी, "एकवीस दिवसांच्या आत" हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ख) खंड (ब) मध्ये, "पट्टीयोग्य मूल्याविरुद्ध" या मजकुरानंतर, "किंवा यथास्थिति, भांडवली मूल्याविरुद्ध" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(ग) खंड (क) मध्ये, "पंधरा दिवसांच्या आत" या मजकुराऐवजी, "एकवीस दिवसांच्या आत." हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(घ) खंड (ड) मध्ये,—

(एक) "पट्टीयोग्य मूल्य" हा मजकूर ज्या दोन ठिकाणी त्याच्या व्याकरणिक फेरफारांसह आला आहे त्या मजकुरानंतर, "किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य" हा मजकूर त्याच्या व्याकरणिक फेरफारांसह समाविष्ट करण्यात येईल ;

(दोन) " आयुक्ताकडे जमा केली नसेल " या मजकुरानंतर, " आणि अशा अपिलासोबत, ज्या कराच्या संबंधात ते अपील असेल त्या कराच्या संपूर्ण रकमेची पावती जोडण्यात आली असेल " हा मजकूर जादा दाखल करण्यात येईल ;

(३) पोट-कलम (२) नंतर, पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :—

"(२अ) अपील, पोट-कलम (२) च्या खंड (अ) ते (ड) च्या तरतुदींना अनुसरून, दाखल करण्यात आले नसेल तर ते, तडकाफडकी फेटाळले जाण्यास पात्र असेल.".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २१८ ची सुधारणा.

**४७.** मुख्य अधिनियमाच्या कलम २१८ मध्ये, खंड (अ) मधील, " पट्टीयोग्य मूल्याविरुद्ध " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याविरुद्ध " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ यामध्ये कलम २१८बअ समाविष्ट करणे.

**४८.** मुख्य अधिनियमाच्या कलम २१८ब नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

कलम २१८ब अंमलात न रहाणे.

**२१८बअ.** कलम १४०अ अन्वये मालमत्ता कर बसविण्यासाठी आधारभूत म्हणून भांडवली मूल्याचा स्वीकार केल्याच्या दिनांकास व तेव्हापासून, कलम २१८ब च्या तरतुदी अंमलात असण्याचे बंद होईल. ".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २१८ड ची सुधारणा.

**४९.** मुख्य अधिनियमाच्या कलम २१८ड मध्ये, पोट-कलम (१) मध्ये, खंड (अ) मधील, " दोन हजार रूपयांपेक्षा अधिक पट्टीयोग्य मूल्य " या मजकुराऐवजी, " पट्टीयोग्य मूल्य किंवा यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २१९ ची सुधारणा.

**५०.** मुख्य अधिनियमाच्या कलम २१९ मध्ये, पोट-कलम (१) मधील, " पट्टीयोग्य मूल्य " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २७९ ची सुधारणा.

**५१.** मुख्य अधिनियमाच्या कलम २७९ मध्ये, पोट-कलम (१) मध्ये खंड (अ) मधील " मागणीची नोटीस रीतसर बजावण्यात आल्यानंतर पंधरा दिवसांच्या आत " या मजकुराऐवजी, " बिलाच्या दिनांकानंतर [तीस दिवसांच्या आत] " साठ दिवसांच्या आत " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

**५२.** मुख्य अधिनियमाच्या कलम ४७३ मधील तक्त्यातील पुढील नोंद वगळण्यात येईल :— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ४७३ ची सुधारणा.

" १५८; पोट-कलम (३) . . . . १७७.".

**५३.** मुख्य अधिनियमाच्या कलम ५१७ मधील, पोट-कलम (१) मध्ये, खंड (ड) मधील, " करयोग्य मूल्य " या मजकुरानंतर " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल. सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ५१७ ची सुधारणा.

**५४.** मुख्य अधिनियमाच्या अनुसूची ग-१ ऐवजी, पुढील अनुसूची दाखल करण्यात येईल :— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या अनुसूची ग-१ ऐवजी नवीन अनुसूची दाखल करणे.

" **अनुसूची ग**

( कलम १९१ई पहा)

**रंगभूमी/नाट्यगृह कर**

| करमणुकीचा प्रकार | कराची कमाल रक्कम |
|---|---|
| (१) वातानुकूलित चित्रपटगृह | प्रत्येक खेळामागे रुपये ६०. |
| (२) वातानुकूलित नसलेले चित्रपटगृह | प्रत्येक खेळामागे रुपये ४५. |
| (३) नाटक, जलसा, करमणुकीचे विविध कार्यक्रम किंवा तमाशा | प्रत्येक खेळामागे रुपये २५. |
| (४) सर्कस आणि आनंदमेळा | प्रतिदिन रुपये ५०. |
| (५) इतर कोणतीही करमणूक | प्रत्येक खेळामागे रुपये ३० किंवा स्वतंत्र खेळ नसतील तर प्रतिदिन रुपये ३०. ". |

**५५.** मुख्य अधिनियमाची अनुसूची आय वगळण्यात येईल. सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याची अनुसूची "आय " वगळणे.

**५६.** मुख्य अधिनियमाच्या अनुसूची ज मध्ये,— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या अनुसूची ज ची सुधारणा.

(१) " किंवा ती न भरण्याबद्दल माझे समाधान होईल असे पुरेसे कारण दाखविलेले नाही " हा मजकूर वगळण्यात येईल ;

(२) " येणे असलेल्या रक्कम ........... ची " या मजकुराने सुरू होणाऱ्या आणि " ती रक्कम भरलेली नाही " या मजकुराने संपणाऱ्या मजकुराऐवजी, पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

" येणे असलेली रक्कम, रुपये ........ भरलेली नाही. उक्त अ. ब. यांच्याकडे उक्त रकमेकरिता यथोचितरित्या देयक बजावण्यात आले असून ते देयक बजावल्यापासून ज्या कालावधीमध्ये त्यांनी उक्त रक्कम भरावयास पाहिजे होती, तो कालावधी उलटून गेला आहे ; ".

शंका दूर करणे.

**५७.** शंका दूर करण्यासाठी याद्वारे घोषित करण्यात येत आहे की, मालमत्ता कर बसविण्यासाठी आधार म्हणून भांडवली मूल्याचा स्वीकार करण्यासाठी, महानगरपालिकेने कलम १४०अ खाली निर्धारित केलेल्या दिनांकालगतपूर्वीच्या कोणत्याही कालावधीशी संबंधित करयोग्य मूल्याच्या आधारे बसवलेल्या कोणत्याही मालमत्ता कराचे कोणतेही निर्धारण, पुन:निर्धारण, तो बसविणे (शास्ती बसविण्यासह) आणि तो गोळा करणे यासंबंधीची सर्व कार्यवाही ही, या अधिनियमात काहींही अंतर्भूत असले तरी, परंतु त्यात अन्यथा स्पष्ट शब्दात तरतूद केली असेल त्याव्यतिरिक्त, मुख्य अधिनियमान्वये जणू काही हा अधिनियम अधिनियमित करण्यात आला नसल्याप्रमाणे सुरू राहील.

अडचणी दूर करण्याचा अधिकार.

**५८.** या अधिनियमाद्वारे सुधारणा करण्यात आलेल्या मुख्य अधिनियमाच्या तरतुदी अंमलात आणताना किंवा त्यामध्ये अंतर्भूत असलेल्या कोणत्याही गोष्टीमुळे किंवा या अधिनियमात अंतर्भूत असलेल्या बाबींच्या संबंधात मुख्य अधिनियमाच्या तरतुदी अंमलात आणताना कोणतीही अडचण उद्‌भवल्यास, राज्य शासनास अडचण दूर करण्याच्या प्रयोजनासाठी, या अधिनियमांद्वारे सुधारणा करण्यात आलेल्या मुख्य अधिनियमाच्या तरतुदींशी विसंगत नसणारी, त्यास आवश्यक किंवा इष्ट वाटेल अशी कोणतीही गोष्ट, प्रसंग उद्‌भवेल त्यानुसार, राजपत्रात प्रसिद्ध केलेल्या आदेशाद्वारे करता येईल :

परंतु, या अधिनियमाच्या प्रारंभाच्या दिनांकापासून दोन वर्षांचा कालावधी समाप्त झाल्यानंतर असा कोणताही आदेश देता येणार नाही.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A,NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004.




# महाराष्ट्र शासन राजपत्र

# असाधारण भाग आठ

वर्ष १, अंक ७ ] सोमवार, एप्रिल १३, २००९/चैत्र २३, शके १९३१ [ पृष्ठे १६, किंमत : रुपये २०.००

असाधारण क्रमांक २४


**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधी व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).**

In pursuance of clause (3) of article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Mumbai Municipal Corporation (Third Amendment) Act, 2006 (Mah. Act No. XI of 2009), is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

H. B. PATEL,
Secretary to Government,
Law and Judiciary Department.

## MAHARASHTRA ACT No. XI OF 2009.

(First published, after having received the assent of the Governor, in the "*Maharashtra Government Gazette*", on the 13th April 2009).

An Act further to amend the Mumbai Municipal Corporation Act.

Bom. III of 1888. WHEREAS it is expedient further to amend the Mumbai Municipal Corporation Act, for the purposes hereinafter appearing ; it is hereby enacted in the Fifty-seventh Year of the Republic of India as follows :—

Short title and commencement.

**1.** *(1)* This Act may be called the Mumbai Municipal Corporation (Third Amendment) Act, 2006.

*(2)* It shall come into force on such date as the State Government may, by notification in the *Official Gazette*, appoint.

Amendment of sub-title under title PROPERTY TAXES in Chapter VIII of Bom. III of 1888.

**2.** In Chapter VIII of the Mumbai Municipal Corporation Act (hereinafter referred to as "the principal Act"), for the sub-title "*Property taxes leviable*", the following sub-title shall be substituted, namely :— Bom. III of 1888.

"*Property taxes leviable on rateable value or capital value*".

Insertion of section 139A in Bom. III of 1888.

**3.** In Chapter VIII of the principal Act, after the sub-title so substituted, the following section shall be inserted, namely :—

Property taxes what to consist.

"**139A.** (*1*) Property taxes leviable on buildings and lands in *Brihan Mumbai* under this Act shall include water tax, water benefit tax, sewerage tax, sewerage benefit tax, general tax, education cess, street tax and betterment charges.

(*2*) For the purposes of levy of property taxes, the expression "building" includes a flat, a *gala,* a unit or any portion of the building.

(*3*) All or any of the property taxes may be imposed on a graduated scale.

(*4*) Save as otherwise provided in this Act, it shall be lawful for the Corporation to continue to levy all property taxes on the rateable value of buildings and lands until the Corporation adopts levy of any or all the property taxes on such buildings and lands on the capital value thereof under section 140A.".

Amendment of section 140 of Bom. III of 1888.

**4.** In section 140 of the principal Act,—

(*1*) for the marginal note, the following marginal note shall be substituted, namely :—

"Property taxes leviable on rateable value, or on capital value, as the case may be, and at what rate.";

(*2*) in sub-section (*1*),—

(*a*) for the portion beginning with the words "The following" and ending with the word "namely" the words "The following property taxes shall be leviable on buildings and lands in *Brihan Mumbai*, namely" shall be substituted ;

(*b*) after the words "rateable value,", wherever they occur in sub-clauses (*i*) and (*ii*) of clause *(a)* and sub-clauses (*i*) and (*ii*) of clause *(b)*, the words "or their capital value, as the case may be," shall be inserted ;

